


# महाराष्ट्र शासन राजपत्र

# भाग चार-अ

वर्ष २, अंक ४] गुरुवार ते बुधवार, एप्रिल १५-२१ २०१०/चैत्र २५-वैशाख १, शके १९३२ [पृष्ठे ११
[ किंमत : रुपये ४.०० ]

## प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

## सामान्य प्रशासन विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ एप्रिल २०१०

## अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक सीडीआर. १००८/प्र.क्र. ४५/०८/११.—भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकाप्रमाणे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियम करीत आहेत :—

१. या नियमांना महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) (सुधारणा) नियम, २०१० असे म्हणण्यात यावे.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ मध्ये,—

(एक) " पोट-नियम (२) नंतर पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :—

" परंतु, महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ याच्या नियम २२अ च्या अर्थांतर्गत लैंगिक छळवादाची तक्रार असेल तर, अशा तक्रारींची चौकशी करण्यासाठी प्रत्येक विभागात किंवा कार्यालयात गठित करण्यात आलेली तक्रार निवारण समिती ; या नियमांच्या प्रयोजनासाठी शिस्तभंगाविषयक प्राधिकाऱ्याने नियुक्त केलेली चौकशी प्राधिकरण असल्याचे मानण्यात येईल आणि जर लैंगिक छळवादाच्या तक्रारीची चौकशी करण्यासाठी, तक्रार निवारण समितीकरिता स्वतंत्र कार्यपद्धती विहित केली नसेल तर, तक्रार निवारण समिती, या नियमांमध्ये घालून दिलेल्या कार्यपद्धतीनुसार, व्यवहार्य असेल तेथवर ; स्वतः चौकशी करील.".

(दोन) पोट नियम (७) ऐवजी, पुढील नियम दाखल करण्यात यावा :—

" (७) चौकशी प्राधिकाऱ्याला दोषारोपाच्या सर्व बाबी व गैरवर्तणुकीच्या किंवा गैरवर्तनांच्या आरोपांचे विवरणपत्र मिळाल्याच्या तारखेपासून, शासकीय कर्मचारी याने, कार्यलयीन कामकाजाच्या दहा दिवसांच्या आत, याबाबतीत चौकशी प्रधिकाऱ्याने लेखी नोटीशीद्वारे विनिर्दिष्ट केले असेल त्या दिवशी व त्या वेळी किंवा चौकशी प्राधिकारी मुभा देईल अशा आणखी दहा दिवसांहून अधिक नसेल इतक्या पुढील कालावधीत स्वतः चौकशी प्राधिकाऱ्यासमोर हजर झाले पाहिजे.".

(तीन) पोट नियम (८) ऐवजी, पुढील पोट नियम दाखल करण्यात येईल :—

" (८) (*अ*) शासकीय कर्मचारी आपल्या वतीने प्रकरण सादर करण्यास, त्याच्या मुख्यालयातील किंवा ज्या ठिकाणी चौकशी घेण्यात येईल त्या ठिकाणच्या कोणत्याही कार्यालयातील इतर कोणत्याही शासकीय कर्मचाऱ्याची मदत घेऊ शकेल. परंतु, या प्रयोजनासाठी, शिस्तभंगाविषयक प्रधिकाऱ्याने नियुक्त केलेला सादरकर्ता अधिकारी हा विधी व्यवसायी असल्याखेरीज किंवा प्रकरणाची परिस्थिती लक्षात घेऊन शिस्तभंगाविषयक प्राधिकाऱ्याने तशी संमती दिली असल्याखेरीज अन्यथा विधी व्यवसायीची मदत घेऊ शकणार नाही :

परंतु, प्रकरणाची परिस्थिती लक्षात घेऊन, आणि लेखी कारणे नमूद करून, चौकशी प्राधिकाऱ्याने तशी संमती दिली तर, शासकीय कर्मचाऱ्याला, इतर कोणत्याही ठिकाणच्या इतर कोणत्याही शासकीय कर्मचाऱ्याची मदत. घेता येईल.

**टीप**.—शासकीय कर्मचाऱ्याला, ज्याच्याकडे याआधीच हाती घेतलेली तीन शिस्तभंगाची प्रकरणे प्रलंबित असतील, अशा इतर कोणत्याही शासकीय कर्मचाऱ्याची मदत घेता येणार नाही.

(ब) शासकीय कर्मचाऱ्याला, राज्यपालांनी याबाबतीत सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, वेळोवेळी, विनिर्दिष्ट केलेल्या अशा शर्तींना अधीन राहून, त्याच्या वतीने प्रकरण सादर करण्यास सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्याची देखील मदत घेता येईल."

३. ही अधीसूचना महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आली असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००४०११४३७२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**म. चिं. पाटील,**
शासनाचे उप सचिव.

क्रमांक सीडीआर.१००८/प्र.क्र. ४५/०८/११,
**सामान्य प्रशासन विभाग**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक १ एप्रिल २०१०.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती

**चा. के. परांजपे,**
शासनाचे अवर सचिव.

---

*पत्राने

# GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 1st April 2010

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. CDR.1008/C.R.45/08/11.— In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Civil Services (Discipline and Appeal) Rules, 1979, namely :—

1. These rules may be called the Maharashtra Civil Services (Discipline and Appeal) (Amendment) Rules, 2010.

2. In rule 8 of the Maharashtra Civil Services (Discipline and Appeal) Rules, 1979,—

(*i*) after the sub-rule (*2*), the following proviso shall be inserted, namely :—

"Provided that, where there is a complaint of sexual harasament within the meaning of rule 22A of Maharashtra Civil Service (Conduct) Rules, 1979, the Complaints Committee established in each Department or Office for inquiring into such complaints, shall be deemed to be the inquiring authority appointed by the diciplinary authority for the purpose of these rules and the Complaints Committee shall hold, if separate procedure has not been prescribed for the Complaints Committee for holding the inquiry into the complaints of sexual harassments, the inquiry as for as practicable in accordance with the procedure laid down in these rules.".

(*ii*) for sub-rule (*7*), the following sub-rule shall be substituted, namely :—

"(*7*) The Government servant shall appear in person before the inquiring authority on such day and at such time within ten working days from the date of receipt by the inquiring authority of the articles of charge and the statement of the imputations of misconduct or

misbehaviour, as the inquiring authority may, by a notice in writing, specify, in this behalf, on within such further time, not exceeding ten days, as the inquring authority may allow.".

(*iii*) for sub-rule (*8*), the following sub-rule shall be substituted, namely :—

"(*8*) (*a*) The Government servant may take the assistance of any other Government servant posted in any office either at his headquarters or at the place where the inquiry is held, to present the case on his behalf, but may not engage a legal practitioner for the purpose, unless the Presenting Officer appointed by the disciplinary authority is a legal practitioner, or, the diciplinary authority, having regard to the circumstances of the case, so permits :

Provided that the Government servant may take the assistance of any other Government servant posted at any other station, if the inquiring authority having regard to the circumstances of the case, and for reasons to be recorded in writing, so permits.

*Note.*—The Government servant shall not take the assistance of any other Government servant who has three pending disciplinary cases on hand in which he has to give assistance.

(*b*) The Government servant may also the assistacne of a retired Government servant to present the case on his behalf, subject to such conditions as may be specified by the Governor, from time to time, by general or special order in this behalf.".

3. This notification is also published on Government web site at *www.maharashtra.gov.in.*

By order and in the name of the Governor of Maharashtra,

M. C. PATIL,
Deputy Secretary to Government.

No. CDR. 1008/C.R.-45/08/11

GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032,

dated the 1st April 2010.

Copy to :—

The Secretary to Governor,

The Principal Secretary to the Chief Minister,

The Secretary to the Deputy Chief Minister,

The Chief Secretary to Government,

All Additional Chief Secretaries / All Principal Secretaries /All Secretaries to Government,

All Private Secretaries /Personal Assistants to Minister's and Minister's of State,

* Registrar, High Court (Original Side), Mumbai,

* Registrar, High Court, Appellate Side, Mumbai,

* Registrar, Office of the Lok Ayukta and Upa Lok Ayukta, Mumbai,

* Secretary, Maharashtra Legislative Assembly Secretariate, Mumbai,

* Secretary, Maharashtra Legislative Council Secretariat, Mumbai

* Secretary, Maharashtra Public Service Commission, Mumbai,

* Commissioner, State Election Commission, Mumbai,

All Departments of mantralaya,

All Heads of Departments and Heads of Offices under
Several Departments of the Mantralaya.

All Desk in General Administration Departments.

Select File.

---

*By letter.

C. K. PARANJAPE,
Under Secretary to Government.